**सन २०२१-२२ चे क्रांतीज्योती सावित्रीमाई फुले राज्य शिक्षक गुणगौरव पुरस्कार प्रदान करण्यासाठीच्या सत्कार समारंभाच्या खर्चास वित्तीय मान्यता व संक्षिप्त देयकावर रक्कम काढण्यास मान्यता देण्याबाबत .**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पीटीसी-२०२२/प्र.क्र.९४/टीएनटी-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय विस्तार भवन,मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २० फेब्रुवारी,२०२३

**वाचा :-**

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.पीटीसी २०२२/ प्र.क्र.३४/ टीएनटी-४, दि.२८जून,२०२२
२) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक),महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्र.शिसं/राशिपु/समारंभ/२०२०/विद्या/ए-२/५५९७,दि.१८ ऑगस्ट,२०२२ चे पत्र.
३) शासन निर्णय,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.पीटीसी २०२२/प्र.क्र.९३/ टीएनटी-४, दि.२६ऑगस्ट, २०२२ व शुध्दीपत्र दि.२० फेब्रुवारी, २०२३
४) शासन निर्णय,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.पीटीसी २०२२/प्र.क्र.८५/ टीएनटी-४, दि.२९ डिसेंबर, २०२२,दि.३० डिसेंबर, २०२२ व दि.१५ फेब्रुवारी, २०२३.

**प्रस्तावना :-**

समाजाची नि:स्वार्थ भावाने आणि निष्ठेने सेवा करणाऱ्या व राज्यातील शैक्षणिक क्षेत्रात उत्कृष्ट काम करणाऱ्या शिक्षकांना त्यांच्या अंगिकृत कामात प्रोत्साहन देण्याच्या व त्यांच्या गुणांचा यथोचित सन्मान करण्याच्या उद्देशाने दिनांक २८जून, २०२२च्या शासन निर्णयातील अटी व शर्ती व निकषांनुसार क्रांतीज्योती सावित्रीमाई फुले राज्य शिक्षक गुणगौरव पुरस्काराने गौरविण्यात येणार आहे.

शासन निर्णय दिनांक २९ डिसेंबर, २०२२ अन्वये सन २०२१-२२ चे क्रांतीज्योती सावित्रीमाई फुले राज्य शिक्षक गुणगौरव पुरस्कार घोषित करण्यात आले आहेत.पुरस्कार वितरण कार्यक्रम दिनांक ०३ जानेवारी, २०२३ रोजी सावित्रीबाई फुले यांच्या जयंती दिनी मुंबई येथे होणार असल्याचे नमूद करण्यात आले होते.तथापि भारत निर्वाचन आयोगाने दिनांक २९ डिसेंबर, २०२२ रोजी महाराष्ट्र विधानपरिषदेच्या पदवीधर मतदारसंघाच्या दोन व शिक्षक मतदारसंघाच्या तीन जागांसाठी निवडणूक कार्यक्रम जाहीर केल्याने आदर्श आचारसंहिता तात्काळ लागू झाली, त्यामुळे दिनांक ०३ जानेवारी, २०२३ चा पुरस्कार वितरण कार्यक्रम स्थगित करण्यात आला होता.

वाचा येथील क्र.२ नुसार सदर पुरस्कार समारंभासाठी लागणाऱ्या अंदाजित खर्चाचा प्रस्ताव शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक),महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी दिनांक १८ ऑगस्ट, २०२२ पत्रान्वये शासनास सादर केला आहे.वाचा येथील क्र.३ च्या शासन निर्णयांन्वये सदर पुरस्कार

समारंभासाठी येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.तथापि,सदरहू कार्यक्रमावरील खर्च भागविण्यासाठी वित्तीय मान्यता देऊन सदर रक्कम संक्षिप्त देयकावर एकरकमी काढण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

समाजाची नि:स्वार्थ भावाने आणि निष्ठेने सेवा करणाऱ्या व राज्यातील शैक्षणिक क्षेत्रात उत्कृष्ट काम करणाऱ्या १०८ शिक्षकांना सन २०२१-२२ या वर्षासाठी क्रांतीज्योती सावित्रीमाई फुले राज्य शिक्षक गुणगौरव पुरस्कार वितरण कार्यक्रम मुंबई येथे शुक्रवार दिनांक २४ फेब्रुवारी, २०२३ रोजी होणार आहे.या पुरस्कार वितरण कार्यक्रमासाठी सन २०२२-२३ करिता खालील लेखाशिर्षांपुढे नमुद केलेल्या तरतूदीमधील रु.१,९०,४५,७००/- (अक्षरी रुपये- एक कोटी नव्वद लाख पंचेचाळीस हजार सातशे फक्त) एवढा निधी शासन मंजूर करत आहे.

| अ.क्र. | लेखाशिर्ष व मागणी क्रमांक | मंजूर तरतूद (रु.हजारात) | मंजूर निधी (रु.हजारात) |
|---|---|---|---|
| १. | "मागणी क्र.ई-२,२२०२, सर्वसाधारण शिक्षण, ८०,सर्वसाधारण,८००,इतर खर्च (०२) संकीर्ण (०२) (०१) आदर्श शिक्षकांना पुरस्कार (दत्तमत) (२२०२२२९२)" | ७०००० | १९०४५.७ |
| २. | "मागणी क्र.ई-२,२२०२, सर्वसाधारण शिक्षण, ८०,सर्वसाधारण,८००,इतर खर्च (०२) संकीर्ण (०२) (४६) आदिवासी क्षेत्रातील उत्कृष्ट कामासाठी शिक्षकांना राज्य पुरस्कार (२२०२३६८२)" | ५०० | - |
| ३. | "मागणी क्र.ई-२,२२०२, सर्वसाधारण शिक्षण, ८०,सर्वसाधारण,८००,इतर खर्च (०२) संकीर्ण (०२) (०३) आदर्श स्त्री शिक्षिका पुरस्कार (२२०२२८८२)" | १ | - |
| | **एकूण** | **७०५०१** | **१९०४५.७** |

२. महाराष्ट्र आकस्मिक खर्च अधिनियम १९६५ च्या परिशिष्ट-१ विवरण पत्र २-मधील अनुक्रमांक ५४ नुसार पारितोषिक वितरण समारंभासाठी संबंधित असलेले अनुषंगिक खर्च संक्षिप्त देयकावर काढणे अनुज्ञेय असून वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग २,अनुक्रमांक ११ अ,नियम क्रमांक ३४, शासन निर्णय दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये अधिदान व लेखा कार्यालय/कोषागार यामधून संक्षिप्त देयकावर रक्कम काढण्याबाबत प्रशासकीय विभागास

रुपये ४ लाख मर्यादपर्यंतचे अधिकार आहेत.परंतु सदर प्रकरणी रक्कम रु.४ लाखापेक्षा जास्त असल्याने सदर समारंभासाठी येणारा एकूण खर्च रु.१९०४५.७ हजार संक्षिप्त देयकावर काढण्यास वित्त विभागाची मान्यता घेण्यात आली आहे. क्रांतीज्योती सावित्रीमाई फुले राज्य शिक्षक गुणगौरव पुरस्कार वितरण समारंभावरील खर्च भागविण्यासाठी एकुण रुपये १,९०,४५,७००/- (अक्षरी रुपये एक कोटी नव्वद लाख पंचेचाळीस हजार सातशे फक्त ) इतकी रक्कम संक्षिप्त देयकावर काढण्यास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे:-

१) संबंधित लेखाशीर्षाखाली दि.३१.१२.२०२२ पूर्वीचे तपशीलवार देयक प्रलंबित नाही.

२) दि.३१.१२.२०२२ नंतर संक्षिप्त देयकावर काढलेल्या सर्व तपशिलवार देयकांचा तत्परतेने निपटारा करण्यात येईल.

३) या संक्षिप्त देयकाचे तपशिलवार देयक एक महिन्याच्या आत सादर करण्यात येईल.तसेच उपयोगिता प्रमाणपत्र तत्काळ सादर करण्यात येईल.

४) खर्च नियमित देयकाद्वारे करणे शक्य नसुन त्यासाठी संक्षिप्त देयकावर रक्कम काढणे अनिवार्य आहे.

५) या संक्षिप्त देयकाचे तपशिलवार देयक विहित मुदतीत सादर करण्याची व्यक्तिगत जबाबदारी शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक),महाराष्ट्र राज्य,पुणे व शिक्षण संचालक (प्राथमिक),महाराष्ट्र राज्य,पुणे यांची राहील.

६) मासिक निधी विवरणपत्रानुसार या करीता निधी उपलब्ध आहे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.९७/२०२३/व्यय-५, दि.३०/०१/२०२३ व अनौपचारिक संदर्भ क्र.३६/२०२३/विनियम,दि.३१/०१/२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०२२०१२१५१६१८२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2023.02.20 12:28:07 +05'30'

**(तुषार महाजन)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य,पुणे

२) शिक्षण संचालक, (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे

३) शिक्षण संचालक, (प्राथमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे

४) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२ मुंबई /नागपूर

५) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

६) अवर सचिव,(अर्थसंकल्प) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,मंत्रालय,मुंबई

७) व्यय - ५/ विनियम/अर्थसंकल्प-८, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई

८) मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव

९) मा.राज्यमंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव

१०) प्रधान सचिव, (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहाय्यक

११) निवडनस्ती- टीएनटी-४.